**एम.आर.ए.मार्ग पोलीस ठाणे, मुंबई येथील गु.र.क्र. २६५/१७, आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई गु.र.क्र. ७९/१७ या प्रकरणी तपास करण्यासाठी डिजिटल फॉरेन्सीक ऑडिटर म्हणून नियुक्ती केलेल्या मे.हेलीक ॲडव्हायझरी लिमिटेड च्या खर्चास कार्योत्तर मंजूर प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमआयएस-२०१६/प्र.क्र.२८७/पोल-११**
गृह विभाग, दुसरा मजला,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः २२/०९/२०२१

**प्रस्तावना :-**

श्री. विनायक कमलाकर राऊत, कॉक्स ॲन्ड किंग्ज लि. या कंपनीचे मुख्य संगणकीय अधिकारी यांनी दिलेल्या फिर्यादीवरुन एम.आर.ए मार्ग पोलीस ठाणे, मुंबई येथे मे.सॅप इंडिया प्रा.लि. या कंपनीविरुध्द गु.र.क्र. २६५/१७, भा.दं.वि. कलम ४०६, ४०८, ४१८, ४२०, ३७९, १२०(ब), ३ सह कलम ४३(अ), ४३(ब), ४३(ज), ६५, ६६ आयटी ॲक्ट अन्वये दाखल केलेला आहे. सदर गुन्हा हा पुढील तपासाकरीता आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई येथे वर्ग करण्यात आला असून त्यास आर्थिक गुन्हे विभागाचा गु.र.क्र. ७९/१७ असा देऊन आर्थिक गुन्हे विभागाकडून सदर गुन्ह्याचा पुढील तपास करण्यात येत आहे. सदर गुन्हयाचा तपास करण्यासाठी डिजिटल फॉरेन्सिक ऑडिटर म्हणून नियुक्त केलेल्या Helik Advisory Ltd चे देयक अदा करण्याकामी वित्तीय मान्यता मिळण्याची विनंती सह पोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई यांनी केली आहे. सदर कंपनीने डिजिटल फॉरेन्सिक ऑडिटर म्हणून केलेल्या कामाचे देयक रु.२२,६०,०००/- अदा करण्याकामी वित्तीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

आर्थिक गैरव्यवहार प्रकरणी दाखल गुन्हयाच्या तपासामध्ये आर्थिक व्यवहाराची तपासणी करणे व उपलब्ध अभिलेखांचे आर्थिक दृष्टीकोनातून वैज्ञानिक दृष्टया पृथ:करण करणे तसेच तपासी यंत्रणेला आवश्यक ते सहाय्य करण्यासाठी तपासाप्रकरणी डिजिटल फॉरेन्सीक ऑडिटर म्हणून Helik Advisory Ltd या कंपनीची नियुक्ती पोलीस आयुक्त, मुंबई कार्यालय अंतर्गत सह पोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे विभाग या कार्यालयाच्या दि.०३.०७.२०१८ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये केलेली आहे. Helik Advisory Ltd कंपनीने सदर कामाचे रु. २२,६०,०००/- एवढया रक्कमेचे देयक सादर केले असून शासनाच्या शासन निर्णय क्र. एमआयएस-२०१६/प्र.क्र.२५२/पोल-११ दिनांक १७.६.२०१७ अन्वये फॉरेन्सिक /डिजिटल फॉरेन्सिक

ऑडिटर, ऑक्शनर व व्हॅल्युअर्स यांच्या सेवेपोटी अदा करावयाच्या फी बाबत रु.१० लक्ष पर्यंत अधिकार पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी यांना व अपर मुख्य सचिव, गृह यांना पूर्ण अधिकार देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने Helik Advisory Ltd या डिजिटल फॉरेन्सिक ऑडीटर कंपनीने सादर केलेल्या रु.२२.६० लक्ष इतक्या करण्यात आलेल्या खर्चाच्या देयकास शासन याद्वारे कार्योत्तर मंजूरी देत आहे. सदरचे देयक आर्थिक गुन्हे विभाग,मुंबई यांच्याकडील उपलब्ध तरतुदीतुन अदा करण्यात यावे.

सदर शासन निर्णय हा शासन निर्णय,गृह विभाग,क्रमांक एमआयएस-२०१६/प्र.क्र.२५२/पोल-११, दि. ०१/१२/२०१६ अंतर्गत वित्तीय अधिकारी नियमपुस्तिका १९७८, भाग-दोन मध्ये महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थामधील) हितसंबधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ च्या अंमलबजावणीसाठी फॉरेन्सिक/डिजीटल ऑडिटर,ऑक्शनर व व्हॅल्युअर्स यांच्या सेवेपोटी अदा करावयाच्या फी करिता वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३९६/२०२१/व्यय-७ दि.१४.०६.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२१०९२२१६२८५५७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh
Murarirao Manale

Digitally signed by Ramesh Murarirao Manale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3afdff0bf288c02a1a4c514992d6ab6f28b31fcbd83bccf465ec868151ee5bbd, serialNumber=2a544f07211ac905895e246b961bc9981c480a91372bb58ae26124a46f104c47, cn=Ramesh Murarirao Manale
Date: 2021.09.22 16:33:40 +05'30'

**( रमेश मनाळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. पोलीस आयुक्त, मुंबई.
६. महालेखापाल कार्यालय (ले.व अ.)/(ले.प.) मुंबई-१
७. सह पोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई.
८. पोलीस उप आयुक्त, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी (व्यय-७) वित्त पवभाग, मांत्रालय,मांबु ई
११. वरिष्ठ पोलीस निरिक्षक, युनिट-५, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई.
१२. मे. हेलीक ॲडव्हायझरी लि.,मराठा मंदीर विस्तार, मराठा मंदीर मार्ग, बाळसाहेब गावडे चौक, मुंबई सेंट्रल, मुंबई-४०० ००८.